डॉ. चारूदत्त शिंदे, विशेष कार्य अधिकारी यांना तात्पुरत्या स्वरूपात ठाणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील "वैद्यकीय आरोग्य अधिकारी" या पदावर प्रतिनियुक्ती देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २०२०/प्र.क्र.९४/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल,१० वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: २३ जून, २०२०.

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३८/कार्यासन-१२, दि.१७.१२.२०१६

२) महानगरपालिका आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे यांचे क्र.ठामपा/वैआअ-प्रनि./आयुक्त/ १३७/२०२०, दि.०९.०६.२०२० रोजीचे पत्र.

**शासन आदेश :-**

कोरोना कोविड-१९ या संसर्गजन्य रोगाचे संक्रमण व प्रादुर्भाव मोठ्या प्रमाणात सुरू असल्याने ठाणे महानगरपालिकेच्या आरोग्य यंत्रणेवर ताण निर्माण झालेला आहे. सदर संसर्गजन्य रोगावर नियंत्रण मिळविण्यासाठी आवश्यक ती प्रतिबंधात्मक उपाययोजना करण्याकरीता महानगरपालिका आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे यांनी केलेल्या विनंतीनुसार डॉ. चारूदत्त शिंदे, विशेष कार्य अधिकारी, मा. मंत्री (नगर विकास विभाग, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)) आस्थापना यांची तात्पुरत्या स्वरूपात ठाणे महानगरपालिकेच्या "वैद्यकीय आरोग्य अधिकारी" या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सदर प्रतिनियुक्ती महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा, निलंबन व बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-३ मधील मार्गदर्शक सूचनाच्या अधीन राहून परिश्ष्टि-२ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती व संदर्भ क्र.०१ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार पुढील आदेशापर्यंत करण्यात येत आहे.

३. डॉ. चारूदत्त शिंदे यांनी प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होऊन तसा अनुपालन अहवाल शासनास व संबंधितांस सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.om या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६२३१७०४५४४३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, serialNumber=9ab69d6945f8950a9525831f8ae9726be295d17576e78d19fa8f6cb952bb04a0, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2020.06.23 17:58:48 +05'30'

(वि. पुं. घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

डॉ. चारूदत्त शिंदे, विशेष कार्य अधिकारी, मा. मंत्री (नगर विकास विभाग, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

प्रत,

१) महानगरपालिका आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे
२) आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
४) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा, (सर्व)
७) उपसंचालक, आरोग्य सेवा, (सर्व)
८) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
१०) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
११) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
१२) अवर सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) मा. मंत्री (सा.आ.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४) मा.मंत्री(नगर विकास विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१५) मा. राज्यमंत्री (सा.आ.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुबई
१६) प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१७) निवडनस्ती